**अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ आणि नियम २००८ मधील नियम ४ (१) (ङ) अन्वये सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती (CFRMC) गठीत करणे व चालविण्याकरिता मार्गदर्शक तत्वे तयार करणे.....**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः वहका-२०१४/प्र.क्र.६६/का-१४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक:- २४ जून, २०१५.

वाचा-

१) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६, नियम २००८, सुधारित नियम २०१२.

प्रस्तावना -

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी ( वनहक्कांची मान्यता ) अधिनियम, २००६, नियम २००८ व सुधारित नियम, २०१२ नुसार अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी यांना कलम ३ (१) नुसार वैयक्तिक व सामूहिक वनहक्क किंवा दोन्हींचे धारणाधिकार मिळण्याचे अधिकार प्राप्त झालेले आहेत.

यामध्ये अनुसूचित जमाती किंवा इतर पारंपारिक वननिवासी यांना **वैयक्तिक वनहक्क** अंतर्गत स्वत:च्या उपजीविकेकरिता वनजमिनी धारण करणेचा, त्यामध्ये राहणेचा व **सामूहिक वनहक्कांतर्गत** निस्तार सारखे हक्क, गावाच्या सीमांतर्गत किंवा सीमेबाहेर पारंपारिकरीत्या गोळा केले जाणारे गौण वनोत्पादन गोळा करणे, त्याचा वापर करणे किंवा त्याची विल्हेवाट लावणे यासाठी स्वामित्व हक्क, पाण्यामधील मत्स्य व अन्य उत्पादने, चराई करणे, पारंपारिक मोसमी साधनसंपत्ती मिळविणे, इत्यादी हक्क आहेत.

अधिनियम २००६ मधील कलम ३ (१) (झ) अन्वये निरंतर वापर करण्यासाठी पारंपारिकरीत्या संरक्षण व संवर्धन करण्यात आलेल्या कोणत्याही सामाजिक वनस्रोताचे संरक्षण, पुर्ननिर्माण, संवर्धन, विनियमन व व्यवस्थापन करण्याचा हक्क, कलम ३ (१) (ट) अन्वये जैविक विविधतेत प्रवेश, बौध्दीक मालमत्ता व पारंपारिक ज्ञान मिळविण्याचा सामुहिक हक्क व कलम ५ च्या तरतूदींनुसार वन्य जीवन, वन जैविक विविधता यांचे संरक्षण करण्यासाठी, सामाजिक वनाचे स्रोत मिळविण्याच्या मार्गाचे विनियमन करणे यासाठी ग्रामसभेने घेतलेल्या निर्णयाचे अनुपालन केले जात असल्याची खात्री करणे इत्यादी बाबींच्या अंमलबजावणीसाठी वनहक्क कायद्यातील

तरतुदींनुसार समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी ( वनहक्कांची मान्यता ) अधिनियम, २००६, नियम २००८ व सुधारित नियम, २०१२ मधील कलम ३ (१) (झ) नुसार निरंतर वापर करण्यासाठी पारंपारिकरित्या संरक्षण व संवर्धन करण्यात आलेल्या कोणत्याही सामाजिक वनस्त्रोताचे संरक्षण, पुर्ननिर्माण, संवर्धन किंवा व्यवस्थापन करणे, कलम ५ नुसार वन्य जीवन, वन व जैविक विविधता यांचे संरक्षण करण्यासाठी व नियम ४ (१) (च) च्या तरतूदींनुसार कर्तव्ये पार पाडण्यासाठी ग्रामसभा तिच्या सदस्यांमधून नियम ४ (१) (ङ) अन्वये एक समिती गठीत करील. संबंधित ग्रामसभेंतर्गत नियम ४ (१) (ङ ) नुसार स्थापन केलेल्या समितीला **"सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समिती" (CFRMC)** असे संबोधण्यात यावे. सदर समितीचे **संनियंत्रन** व नियंत्रण ग्रामसभा करेल.

**नियम ४ (१) (ङ) अन्वये सामूहिक वनहक्क समितीची स्थापना (CFRMC)**

ग्रामसभेतील सामूहिक वन संपत्तीचे संवर्धन व व्यवस्थापन योजना तयार करणे, नैसर्गिक साधन संपत्तीच्या व्यवस्थापनातून प्राप्त होणारा महसूल तसेच शासनाकडून प्राप्त होणारा निधी यांचे बँक खात्यामार्फत संनियंत्रण करणे, जमाखर्चाचे लेखे व लेखापरीक्षण ठेवणे इ. प्रशासकीय बाबी पार पाडण्याकरीता सदर समिती ही वनहक्क कायद्याच्या अंमलबजावणीसाठी **ग्रामसभेची कार्यकारी समिती असेल.**

**२. वनहक्क कायद्यातील अधिनियम २००६, नियम २००८ व सुधारित नियम, २०१२ व जनजाती कार्य मंत्रालय, भारत सरकार, यांनी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समिती (CFRMC) आपली कर्तव्ये व जबाबदाऱ्या पार पाडेल.**

३. या संदर्भात " ग्रामसभा म्हणजे अधिनियम कलम २(छ) व (२) (त) नुसार गावातील सर्व प्रौढ सदस्यांची मिळुन बनलेली ग्रामसभा आणि पंचायत नसलेल्या राज्यांच्या बाबतीत पाडे, टोले, व अन्य पारंपारिक ग्रामसंस्था आणि महिलांचा पुर्ण व अनिर्बंध सहभाग असलेल्या निर्वाचित ग्राम समित्या " असाव्यात.

**ग्रामसभेची व्याख्या**

**४. सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीसाठी वनहक्क कायद्याच्या अंमलबजावणीसाठी सहाय्यकारी मार्गदर्शक सूचना:-**

१) सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समिती ही ग्रामसभेतील वनहक्क धारकांमधून सर्व वनहक्क धारकांचे प्रतिनिधीत्व करणारी समिती असेल. त्यामध्ये किमान ५ व कमाल ११ सदस्य असावेत. बैठकीची गणपुर्ती सर्व सदस्य संख्येच्या अर्ध्यापेक्षा कमी नसतील इतक्या सदस्य संख्येने होईल परंतू, उपस्थित सदस्यांच्या किमान एक-तृतियांश इतक्या महिला असतील.

**समितीसाठी मार्गदर्शक सूचना**

२) सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समिती त्यांच्या सदस्यांमधून एक अध्यक्ष, एक सचिव व एक खजिनदार यांची बहुमताने निवड करेल, यापैंकी एक पदाधिकारी महिला असेल. अध्यक्ष हा अनुसूचित जमातीचा असावा.

३) सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीच्या बैठकीची सूचना अध्यक्ष / सचिव यांचे स्वाक्षरीने निर्गमित करतील.

४) सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीची तातडीची बैठक बोलावयाची झाल्यास गावांमध्ये ड्रम वाजवून / दवंडी अर्धा तास अगोदर देण्यात यावी.

५) सचिव मागील बैठकीत झालेल्या इतिवृत्तास मान्यता घेतील तसेच इतिवृत्तातील मुद्यांवर केलेल्या कार्यवाहीची सदस्यांना माहिती देतील.

**५. सामुहिक वन हक्क व्यवस्थापन ( CFRMC ) समितीची कामे:-**

**सामुहिक वन हक्क व्यवस्थापन ( CFRMC ) समितीची कामे**

१) अधिनियम २००६ मधील कलम ५ मध्ये दर्शविलेली कर्तव्ये ग्रामसभेच्या मान्यतेने पार पाडणे.

२) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी यांच्या फायद्यासाठी ग्रामसभेच्या मान्यतेने सामूहिक वन संपत्तीचे निरंतर व समसमान व्यवस्थापन करण्यासाठी नियम ४ (१) (च) मधील तरतूदीनुसार सामूहिक वन संपत्तीचे संवर्धन करण्याची व तिचे व्यवस्थापन करण्याची योजना तयार करेल.

३) वन विभागाच्या सूक्ष्म योजना, चालू योजना ( working plan ) किंवा व्यवस्थापन योजनांबरोबर अशा संवर्धन व व्यवस्थापन योजनांचे, समितीला आवश्यक वाटेल अशा फेरबदलांनिशी एकत्रिकरण करणे.

४) सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समितीच्या क्षेत्रातील वन व्यवस्थापन, जमिन आणि पाणी यांचा परिणामकारक आराखडा तयार करणे.

५) कायद्याचे उल्लंघन होऊ नये आणि त्याची अंमलबजावणी खात्रीशीर होण्यास ग्रामसभेच्या मान्यतेने आणि वनहक्क कायद्याशी सुसंगत अशी नियमावली करणे.

६) वाहतूक परवाना, उत्पादनांच्या विक्रीपासूनचे उत्पन्न किंवा व्यवस्थापन आराखडयात बदल करण्याशी संबंधित सर्व निर्णयांना मान्यता देणे.

७) केंद्र शासनाने १२ गौणवनोपजाची किमान आधारभूत किंमती (MSP) आधारे खरेदीची यंत्रणा राज्यात स्थापन करण्याबाबत सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार समितीने वनोपजाची किमान आधारभूत किंमतीपेक्षा कमी दराने विक्री होणार नाही याची दक्षता घ्यावी.

८) ग्रामसभेतील नैसर्गिक साधनसंपत्तीच्या व्यवस्थापनातून प्राप्त होणारा महसूल तसेच शासनाकडून प्राप्त होणारा निधी याचे बँक खात्यामार्फत संनियंत्रण करणे.

९) वनहक्काशी संबंधित कामे, खर्चाचे अंदाजपत्रक तयार करणे व त्यास ग्रामसभेची मान्यता घेणे.

१०) ग्रामसभेचे निर्देश व निर्णयानुसार कामे करणे.

११) कामाची प्रगती, निधी व इतर बाबतीत ग्रामसभेला अहवाल सादर करणे.

१२) समितीचे सर्व दप्तर व अनुषंगीक कागदपत्रांचे जतन करणे व जमा खर्चाचे लेखे ठेवणे.

१३) वनहक्क कायदा, शासन निर्णय आणि धोरणाचे वाचन करुन ग्रामसभेस माहिती देणे अथवा प्रशिक्षण देणे.

१४) सामुहिक वन जैविक विविधता यांचे रजिस्टर अद्यावत ठेवणे.

१५) समितीचे लेखे हाताळणे, समितीच्या बँक खात्यातुन ग्रामसभेच्या मान्यतेने ठराव घेऊन निधी काढणे.

१६) समितीने हाती घेतलेल्या व पूर्ण केलेल्या कामांचा तपशिल ग्रामसभेमध्ये बोर्डावर दाखविणे.

१७) समितीने केलेल्या कामांचे फोटोग्राफ व इतर दस्ताऐवज ग्रामसभांमध्ये ठेवणे.

**जिल्हाधिकारी यांचे बँकांना निर्देश**

**६. सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समिती ( CFRMC ) ही वनहक्क कायद्यातील तरतूदींनुसार स्थापन करण्यात आलेली असल्याने सदर समितीची कोणत्याही संस्थेकडे नोंदणी करण्याची आवश्यकता नाही. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा स्तरीय वनहक्क समिती यांनी सर्व बँकांना कोणत्याही अडथळयांशिवाय प्राथम्याने सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीच्या नावे बँक खाते उघडण्याबाबत बँकांना निर्देश द्यावेत.**

**जिल्हाधिकारी यांची कर्तव्ये**

**७.** जिल्हास्तरीय वनहक्क समिती व उपविभागीय स्तरीय समितींनी त्यांच्या कार्यक्षेत्राअंतर्गत राज्यातील ग्रामसभा अंतर्गत स्थापन झालेल्या १५००२ ग्रामस्तरीय वनहक्क समित्यांच्या क्षेत्रात नियम ४ (१) (ङ) नुसार सदर सामुहिक वनहक्क व्यवस्थापन समिती स्थापन झाल्याबाबतची खात्री करावी. तसेच नियम १२ ख (४) नुसार एखाद्या गावामध्ये कोणत्याही प्रकारचे सामुहिक वनसंसाधनाचे हक्क मान्य करण्यात येणार नाहीत त्यांची कारणे जिल्हा स्तरीय समितीच्या सचिवांकडून नमूद करण्यात येऊन त्याबाबतचा अहवाल नोडल अधिकारी, आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडे पाठवावा.

**८. बँक खाते हाताळणे व वार्षिक लेखापरिक्षण:-**

**बँक खाते हाताळणे व वार्षिक लेखापरिक्षण**

१) सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीचे आर्थिक व्यवहार व प्रशासकीय कामकाज सुरळीतपणे पार पाडण्यासाठी समितीचे अध्यक्ष, सचिव व खजिनदार ज्यामध्ये एक महिला असावी, त्यांच्या संयुक्त नांवाने बँक खाते उघडण्यात यावे. यापैकी दोन पदाधिका-यांच्या स्वाक्षरीने बँकेचे व्यवहार ग्रामसभेच्या मान्यतेने हाताळण्यात येतील.

२) लेखाविषयक पुस्तके, धनादेश व इतर प्रशासकीय कामकाजाची कागदपत्रे ग्रामसभेच्या कार्यालयात ठेवण्यात यावीत. सर्व रक्कमांची प्रदाने समितीने घेतलेल्या ठरावानुसार व केवळ खातेवर (Account Payee) धनादेशाव्दारे करण्यात येतील.

४) संयुक्त खातेधारकांनी किती किरकोळ रक्कम बाळगावी याबाबत ग्रामसभेने नियम ठरवावेत.

५) सामुहिक वनहक्क व्यवस्थापन समिती अंतर्गत होणाऱ्या सर्व व्यवहारांचे लेखे ग्रामसभा स्तरावर ठेवण्यात येतील. समितीच्या लेख्याचे लेखा परीक्षण (ऑडिट) जिल्हा परिषदेच्या स्थानिक लेखा निधीच्या लेखा परीक्षकाकडून होईल.

**समितीच्या बळकटी करणासाठी चालू योजनांचे लाभ**

९. जिल्हा स्तरीय वनहक्क समिती व उपविभागीय वनहक्क समिती यांनी सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समितीने ग्रामसभेच्या मान्यतेने हाती घेतलेल्या विकास आराखडयातील कामांची अंमलबजावणी करण्यासाठी तसेच त्यांच्या बळकटीकरणासाठी जिल्हयातील वेगवेगळया विभागांच्या विविध चालु योजनांचे लाभ सामुहिक वनहक्क व्यवस्थापन समित्यांना देण्यांबाबत कार्यवाही करुन संनियंत्रण करावे.

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे या समितीच्या स्थापना व कार्यान्वयासाठी नोडल एजन्सी म्हणून काम पाहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२५१६५४०३४४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh D Naik

Digitally signed by Suresh D Naik
DN: CN = Suresh D Naik, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.06.25 16:56:13 +05'30'

**( सु. द. नाईक )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव.
२. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई

९. प्रधान सचिव (कृषी व पदुम), मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११.आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
१२.आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१३.सर्व जिल्हाधिकारी.
१४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद.
१५.अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर,अमरावती,
१६.व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.नाशिक.
१७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१९.महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
२०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२१. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
२२.जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
२३.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
२४.सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्या.अधिकारी,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२५.निवड नस्ती.(का.१४), आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई